**जलस्वराज्य - २ कार्यक्रम.**
शहरालगतच्या (Peri-urban) भागातील गावे / वाड्यांसाठी पाणी पुरवठा व स्वच्छता योजनांच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना.

महाराष्ट्र शासन
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जस्वका-०२१४/ प्र. क्र. ५५/ पापु-११.**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४००००१
दिनांक: १८ फेब्रुवारी, २०१७.

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-१२१३ / प्र. क्र. २०० / पापु-११, दि. ०४/०१/२०१४.
२) शासन परिपत्रक क्रमांकः जस्वप्र-०२१४ / प्र. क्र. ५५ / पापु-११, दि. ११/०६/२०१४.
३) शासन परिपत्रक क्रमांक.जस्वप्र-२/०७०८ /पर्यात/ प्र.क्र.११/ पापु-११, दि.५/८/२०१४.
४) शासन निर्णय क्रमांक: जस्वका-२/०७१५/विसंक(तां)/प्र.क्र.१३/पापु-११,दि.१/१/२०१६
५) शासन शुद्धीपत्रक क्रमांकः जस्वप्र-०२१४ / प्र. क्र. ५५ / पापु-११, दि. १/०२/२०१६.
६) शासन निर्णय क्रमांक: जस्वप्र-०११६/वि.सं.क.(तां)/प्र.क्र.२१/पापु-११,दि. २/०२/२०१६

**प्रस्तावना :**

राज्यात सन २०१४ ते सन २०१९ या कालावधीकरिता जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने दि. ४ जानेवारी, २०१४ रोजी निर्गमित शासन निर्णयानुसार जलस्वराज्य-२ कार्यक्रम सुरु करण्यात आला आहे.

ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधांचे नियोजन, अंमलबजावणी, संनियंत्रण व शाश्वतता याबाबत या क्षेत्रातील संस्थांच्या कामगिरीचा दर्जा उंचावणे तसेच शहरालगतच्या, टंचाईग्रस्त व पाणी गुणवत्ताबाधित भागांमध्ये गुणवत्तापूर्ण व शाश्वत पाणी पुरवठा सेवा पुरविणे, हे या कार्यक्रमाचे मुख्य उद्दिष्ट आहे. जलस्वराज्य-२ या कार्यक्रमांतर्गत जागतिक बँकेकडून मिळणारे अर्थसहाय्य हे Program for Results ( P for R ) या वित्तिय साधनांतर्गत उपलब्ध होणार असून ते उद्दीष्टपूर्ती आधारित निधी संवितरण निर्देशकांशी (Disbursement Linked

Indicators - DLIs) निगडीत आहे. जलस्वराज्य-२ कार्यक्रम P for R या तत्त्वावर आधारित असा हा देशातील पथदर्शी कार्यक्रम आहे.

**०२.** जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत मुख्य भौतिक गुंतवणूक या घटकांतर्गत राज्यातील १२ जिल्ह्यांमध्ये पथदर्शी स्वरुपात शहरालगतच्या गावे / वाडया / वस्त्यांमध्ये ७० लिटर्स दरडोई दरदिवशी पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी नळ पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी करण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. या कार्यक्रमांतर्गत भौतिक कामांसाठी अमरावती, बुलडाणा, औरंगाबाद, नांदेड, रायगड, रत्नागिरी, नागपूर, चंद्रपूर, अहमदनगर, जळगांव, पुणे व सातारा या १२ जिल्ह्यांची निवड करण्यात आली आहे.

**०३.** शहरालगतच्या गावांमध्ये पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना दि. ११ जून, २०१४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आल्या होत्या. त्यानंतर जलस्वराज्य-२ कार्यक्रम अधिक प्रभावीपणे व यशस्वीरित्या राबविण्याकरिता दि. ०१ जानेवारी, २०१६ च्या शासन निर्णयानुसार शहरालगतच्या भागातील योजनांची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे.

**०४.** सद्यस्थितीत क्षेत्रीय स्तरावरील उपक्रम हे अंमलबजावणी टप्प्यात असून क्षेत्रीय परिस्थितीनुसार योग्य, अचूक व तातडीने निर्णय घेण्याकरिता एकत्रित व सुस्पष्ट सुधारित मार्गदर्शक सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

उपरोक्त नमुद वस्तुस्थितीच्या पार्श्वभुमीवर जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतच्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसंदर्भात निर्गमित करण्यात आलेले दि. ११ जून, २०१४, दि. ०१ जानेवारी, २०१६, दि. ०१ फेब्रुवारी, २०१६ व दि. ०२ फेब्रुवारी, २०१६ रोजी निर्गमित करण्यात आलेले शासन निर्णय /शासन परिपत्रक/ शासन शुध्दीपत्रक या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत आहेत. जलस्वराज्य-२ या कार्यक्रमांतर्गत

शहरालगतच्या गावे / वाडया / वस्त्यांमध्ये अंमलबजावणी करावयाच्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या संदर्भात खालीलप्रमाणे सुधारित मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

०१. **अंमलबजावणी :-**

जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणाऱ्या सर्व योजनांच्या संकल्पनामध्ये एकवाक्यता व सुसूत्रता आणण्याकरिता सर्व नळ पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्यात येईल. या कार्यक्रमांतर्गत शहरालगतच्या भागामध्ये अंमलबजावणी करावयाच्या सर्व नळ पाणी पुरवठा योजनांच्या नियोजन, अंमलबजावणी, कार्यान्वयन, देखभाल व दुरुस्ती तसेच संनियंत्रण व मूल्यमापन इ. टप्प्यांमध्ये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचा सक्रीय सहभाग असेल.

०२. **पात्रतेचे निकष :-**

जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतच्या भागांमध्ये दरडोई दरदिवशी ७० लिटर्सप्रमाणे पिण्याच्या पाण्याच्या सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी नळ पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी करण्याकरिता गावे /वाडया / वस्त्या यांची निवड करण्यासाठी पुढील निकषांची पूर्तता होणे आवश्यक आहे -:

(I) सदरची गावे /वाडया / वस्त्या या महानगरपालिका / नगरपालिका / नगर परिषद यांच्या सीमारेषेपासून १०कि.मी. च्या परिघातील असाव्यात.

(II) शहरालगतची गावे / वाडया / वस्त्यांची सन २०११ च्या जनगणनेनुसार लोकसंख्या २००० पेक्षा जास्त व २५००० पेक्षा कमी असावी.

(III) या प्रकल्पांतर्गत निवडण्यात आलेले प्रत्येक गाव हागणदारीमुक्त ( ODF) करण्यात यावे. जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत योजना प्रस्तावित करण्याच्या दृष्टीने या कार्यक्रमाच्या अटी मान्य असल्याबाबत तसेच गाव हागणदारीमुक्त करण्याबाबतचा ग्रामसभेचा ठराव करणे आवश्यक आहे. ग्रामपंचायत ठरावाचा नमुना परिशिष्ट "अ" मध्ये जोडला आहे.

## ०३. <u>जिल्हास्तरीय समित्या :-</u>

जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतची गावे / वाडया /वस्त्यांची निवड करण्याकरिता जिल्हा स्तरावर पुढील समित्या गठीत करण्यात याव्यात :-

(I) जिल्हा तांत्रिक समिती

(II) जिल्हा कार्यक्रम समन्वय समिती

### (I) <u>जिल्हा तांत्रिक समिती :-</u>

**उद्देश :-** जलस्वराज्य २-कार्यक्रमांतर्गत शहरालगतच्या भागामध्ये नळ पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी करण्याकरिता आवश्यकतेनुसार गावांची निवड करून त्यांचा प्राधान्यक्रम तयार करण्यासाठी अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे अध्यक्षतेखाली जिल्हा तांत्रिक समिती गठित करण्यात येत आहे.

**संरचना :-** जिल्हा तांत्रिक समितीची संरचना पुढीलप्रमाणे आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. | अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | अध्यक्ष |
| २. | कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद | सदस्य |
| ३. | कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | सदस्य |
| ४. | वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा | सदस्य |
| ५. | सहाय्यक अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | सदस्य सचिव |

<u>**कार्यकक्षा :-**</u>

❖ जिल्ह्याच्या प्राधान्यक्रम यादीचा आढावा घेवून पात्रता निकषांनुसार शहरालगतच्या गावांची सुधारित प्राधान्यक्रम यादी तयार करणे.

- ❖ शहरालगतच्या गावांची सुधारित प्राधान्यक्रम यादी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखालील जिल्हा कार्यक्रम समन्वय समितीच्या बैठकीत मंजूर करुन घेणे.
- ❖ समितीच्या सदस्यांचा एकत्रित दौरा आयोजित करुन शहरालगतच्या भागातील गावांमधील नळ पाणी पुरवठा योजनांकरिता उपलब्ध विविध पर्यायी स्त्रोतांपैकी शाश्वत स्त्रोत अंतिम करणे.
- ❖ प्रस्तावित नळ पाणी पुरवठा योजना तांत्रिक व आर्थिकदृष्ट्या योग्य असल्याची खात्री करणे.

(II) **जिल्हा कार्यक्रम समन्वय समिती :-**

**उद्देश :-** जलस्वराज्य २-कार्यक्रमांतर्गत शहरालगतच्या भागामध्ये नळ पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी करण्याकरिता गावांची प्राधान्यक्रम यादी अंतिम करण्यासाठी व जिल्हास्तरावर कार्यक्रमाची अंमलबजावणी करणाऱ्या विविध यंत्रणावर नियंत्रण ठेवण्याकरिता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखाली जिल्हा कार्यक्रम समन्वय समिती गठित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २. | कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग ,जिल्हा परिषद | सदस्य |
| ३. | संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग | सदस्य |
| ४. | उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( ग्रामपंचायत),जिल्हा परिषद | सदस्य |
| ५. | जिल्हा आरोग्य अधिकारी, आरोग्य विभाग ,जिल्हा परिषद | सदस्य |
| ६. | वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा | सदस्य |
| ७. | उप मुख्य कार्यकारी अधिकार (पाणी व स्वच्छता),जिल्हा परिषद | सदस्य सचिव |

**कार्यकक्षा :-**

- ❖ जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, जिल्हा परिषद ,सहाय्यकारी संस्था तसेच गावस्तरीय समित्या यांचेमध्ये समन्वय साधण्याच्या दृष्टीने आढावा घेणे.
- ❖ अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे अध्यक्षतेखालील जिल्हा तांत्रिक समितीने निवड केलेल्या शहरालगतच्या गावांची सुधारित प्राधान्यक्रम यादी अंतिम करणे.

०४. **निवड प्रक्रिया :-**

(I) एका जिल्हयामध्ये हाताळावयाच्या गावे /वाडया / वस्त्यांची सन २०११ ची एकत्रित लोकसंख्या साधारणत: ५०००० इतकी राहील .

(II) जिल्ह्यातील अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे अध्यक्षतेखालील जिल्हा तांत्रिक समितीने प्रत्यक्ष क्षेत्र पाहणीव्दारे संभाव्य पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोतांच्या आधारे (गावे / वाडयाचे भौगोलिक स्थान, संभाव्य स्त्रोत, लगतच्या नगरपालिकेच्या सध्याच्या पाणी पुरवठा स्त्रोतामधून पाणी उपलब्ध होण्याची शक्यता, इ. बाबी लक्षात घेवून) प्राधान्यक्रम यादीतील निम-शहरी गावे / वाडयांची सन २०११ च्या जनगणनेनुसार स्वतंत्र योजना प्रस्तावित करणे, तांत्रिक व आर्थिक दृष्टया योग्य राहतील, याची पडताळणी करावी.

(III) जिल्हा तांत्रिक समितीच्या बैठकीत जिल्ह्यातील शहरालगतची गावे /वाडया / वस्त्या यांचा प्राधान्यक्रम तयार करुन व त्याचा आढावा घ्यावा. उपरोक्त पात्रता निकषांनुसार शहरालगतच्या गावांची सुधारित प्राधान्यक्रम यादी तयार करावी.

(IV) शहरालगतच्या गावांची सुधारित प्राधान्यक्रम यादी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखालील जिल्हा कार्यक्रम समन्वय समितीच्या बैठकीत मंजूर करुन घेण्यात यावी.

(V) या कार्यक्रमांतर्गत शहरालगतच्या गावांमधील नळ पाणी पुरवठा योजनांसाठी जिल्हानिहाय निधीचे आवश्यकतेनुसार पुर्नविनियोजन करण्याचे अधिकार प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना राहतील.

(VI) अंतिम निवड करण्यात आलेल्या गावांमध्ये नळ पाणी पुरवठा योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता गावातील ग्रामस्थांमध्ये जाणीव जागृती निर्माण करण्याकरिता नियुक्त करण्यात आलेल्या सहाय्यकारी संस्था व समाज व्यवस्थापन तज्ञ यांना समाजव्यवस्थापनाचे काम सुरु करण्याचे आदेश उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) जिल्हा परिषद यांनी द्यावेत.

**०५. <u>सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणे</u>**

(I) जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतच्या गावे / वाडया / वस्त्यांकरिता प्रस्तावित करावयाच्या नळ पाणी पुरवठा योजनांचे सविस्तर प्रकल्प अहवाल महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत तयार करण्यात यावेत.

(II) ग्राहक सर्वेक्षण, जी.आय.एस.मॅपिंग, तक्रार निवारण पध्दत स्थापित करणे, वित्तीय व्यवस्थापन या बाबींसाठी अपेक्षित असलेल्या खर्चाची तरतूद सविस्तर प्रकल्प अहवालात करावी. मात्र सर्वेक्षणासाठी करण्यात यावयाच्या खर्चाच्या धर्तीवर काही आवश्यक बाबींसाठी (उदा. ग्राहक सर्वेक्षण, जी.आय.एस. इमेज प्राप्त करुन घेणे, टोटल स्टेशन सर्वेक्षण इ.) आगाऊ खर्च करता येईल. हा खर्च सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये समाविष्ठ करण्यात यावा.

(III) सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करताना प्रस्तावित नळ पाणी पुरवठा योजनेमुळे पर्यावरण विषयक बाबींचे उल्लंघन होणार नाही याची दक्षता घ्यावी.

(IV) सविस्तर प्रकल्प अहवाल तयार झाल्यानंतर ग्रामसभेची बैठक घेवून त्याबाबतची सविस्तर चर्चा करण्यात यावी. सदर बैठकीत प्रस्तावित नळ पाणी पुरवठा योजनेचा स्त्रोत, इतर उपांगे, उपांगांकरिता आवश्यक ती भूसंपादन, योजनेचा खर्च योजना पूर्ण झाल्यानंतर देखभाल दुरुस्तीसाठी आवश्यक रक्कम व त्यासाठी पाणी पट्टीची रक्कम

याबाबत सविस्तर चर्चा करण्यात यावी. त्यास मान्यता असल्याचा ग्रामसभेचा ठराव संमत करण्यात यावा. ग्रामसभा ठरावाचा मसुदा परिशिष्ट “अ” मध्ये जोडला आहे.

(V) ग्रामसभा आयोजित करून ग्रामसभा ठराव संमत करून घेण्याची जबाबदारी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांची संयुक्तपणे राहील.

(VI) योजना मागणीबाबतचा ग्रामसभेचा ठराव, पाणी आरक्षण, रस्ते / रेल्वे क्रॉसिंग असल्यास त्याबाबतच्या परवानग्या व योजनेतील उपांगांकरिता आवश्यक ती जमिन उपलब्ध असल्याबाबतचा तपशील इ. कागदपत्रे जोडण्यात यावीत.

**०६. योजनांची तांत्रिक मान्यता पूर्व पडताळणी**

या कार्यक्रमांतर्गत अंमलबजावणी करण्यात येणाऱ्या योजनांच्या सविस्तर प्रकल्प अहवालाची पडताळणी करण्यासाठी राज्यस्तरावर दोन समित्या गठीत करण्यात येत आहेत.

i. राज्यस्तरीय पडताळणी उप समिती

ii. राज्यस्तरीय पडताळणी समिती

**i. राज्यस्तरीय पडताळणी उप समिती:-**

**उद्देश :-** जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतची गावे/वाड्या/वस्त्यांमध्ये वाढीव दराने पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करून देण्याकरिता प्रस्तावित करण्यात आलेल्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या सविस्तर प्रकल्प अहवालाची तांत्रिक तपासणी करण्याकरिता संचालक (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय पडताळणी उप समिती गठीत करण्यात आली आहे.

**संरचना:-** राज्यस्तरीय पडताळणी उप समितीची संरचना पुढीलप्रमाणे आहे -:

| | | |
|---|---|---|
| १. | संचालक (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई | अध्यक्ष |
| २. | मुख्य अभियंता, म. जी. प्रा., संबंधित प्रादेशिक विभाग | सदस्य |
| ३. | अधीक्षक अभियंता, विशेष संनियंत्रण कक्ष, म. जी. प्रा. मुंबई | सदस्य |
| ४. | अधीक्षक अभियंता (मुख्यालय), म. जी. प्रा., मुंबई | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ५. | अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), म. जी. प्रा., ठाणे | सदस्य |
| ६. | वित्त नियंत्रक, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई | सदस्य |
| ७. | कार्यकारी अभियंता, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई | सदस्य सचिव |

**कार्यकक्षा :-**

- ❖ जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतच्या गावे /वाड्यांमधील योजनांच्या सविस्तर प्रकल्प अहवालांची तांत्रिक तपासणी करणे.
- ❖ योजनेच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये आवश्यक त्याच उपांगांचा समावेश करण्यात आला आहे, याबाबतची खात्री करणे.
- ❖ योजनेच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये काही त्रुटी असल्यास त्याप्रमाणे शेरे उपस्थित करून त्यांची पुर्तता करण्याबाबत संबंधित अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना निर्देश देणे.
- ❖ तांत्रिकदृष्ट्या परिपूर्ण सविस्तर प्रकल्प अहवाल राज्यस्तरीय पडताळणी समितीकडे तांत्रिक मान्यतापूर्व तपासणीसाठी सादर करणे.

ii **राज्यस्तरीय पडताळणी समिती :-**

**उद्देश :-** जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतची गावे/वाड्या/वस्त्यांमध्ये वाढीव दराने पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करून देण्याकरिता प्रस्तावित करण्यात आलेल्या नळ पाणी पुरवठा योजनांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची शिफारस करण्यासाठी प्रधान सचिव ,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय पडताळणी समिती गठीत करण्यात आली आहे.

**संरचना :-** राज्यस्तरीय पडताळणी समितीची संरचना पुढीलप्रमाणे आहे:-

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मुंबई | अध्यक्ष |
| २. | सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई | सदस्य |
| ३. | संचालक (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई | सदस्य |
| ४. | उप सचिव तथा प्रकल्प संचालक, पा. पु. व स्व. विभाग, मुंबई | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ५. | मुख्य अभियंता तथा वि.का.अ., पा. पु. व स्व. विभाग, मुंबई | सदस्य |
| ६. | प्रकल्प व्यवस्थापक, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई | सदस्य |
| ७. | वित्त नियंत्रक, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई | सदस्य |
| ८. | अवर सचिव, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई | सदस्य |
| ९. | अधीक्षक अभियंता (मुख्यालय), म. जी. प्रा., मुंबई | निमंत्रित सदस्य |
| १०. | अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), म. जी. प्रा., ठाणे | निमंत्रित सदस्य |
| १२. | कार्यकारी / उप अभियंता, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :-**

- ❖ संचालक (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय पडताळणी उप समितीने तांत्रिकदृष्ट्या तपासणी केलेल्या शहरालगतच्या गावांच्या सविस्तर प्रकल्प अहवालांची तांत्रिक मान्यतापूर्व तपासणी करणे.
- ❖ तांत्रिक मान्यतापूर्व तपासणी झालेल्या सविस्तर प्रकल्प अहवालांच्या प्रशासकीय मान्यतेसाठी शिफारस करणे.

**०७. प्रशासकीय मान्यता :-**

(I) जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतची गावे / वाडया / वस्त्यांमध्ये वाढीव दराने पिण्याच्या पाण्याच्या सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी प्रस्तावित करण्यात आलेल्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना राहतील.

(II) राज्यस्तरीय पडताळणी समितीने शिफारस केल्यानंतर संबंधित अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी आवश्यक त्या कागदपत्रांसह योजनेच्या सविस्तर प्रकल्प अहवालास तांत्रिक मान्यता घेवून सदरचा प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई या कार्यालयास सादर करावा.

(III) राज्यस्तरीय पडताळणी समितीने काही मुद्दे उपस्थित केले असल्यास सदर मुद्दयांच्या पूर्तता अहवालासह परिपूर्ण प्रस्ताव सादर करण्याची जबाबदारी संबंधित अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची राहील.

(IV) नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षामार्फत प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या मान्यतेसाठी सादर करण्यात येईल. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांची मान्यता अंतिम राहील.

**०८. <u>निविदा प्रक्रिया व अंमलबजावणी</u>**

(I) योजनेच्या अंदाजपत्रकातील ऑटोमेशन, जलमापक व निविदा दस्ताऐवजातील शेडयुल ए मधील बाबी वगळून उर्वरित कामांसाठी एकत्रित एकच ई-निविदा सूचना स्वतंत्रपणे मागविण्यात यावी व त्यानुसार निविदा प्रक्रिया पूर्ण करावी. शासनाद्वारे वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या निर्देशाप्रमाणे निविदा प्रक्रियेमध्ये सुधारणा करावी.

(II) कंत्राटदाराने योजनेचे काम निविदा कालावधीपूर्व पूर्ण केल्यास निविदा किंमतीच्या १.८% पर्यंत प्रोत्साहन अनुदान देण्यात येईल. याबाबतच्या तपशीलवार अटी व शर्ती निविदेमध्ये समाविष्ट करण्यात याव्यात.

(III) योजनेचे काम निविदा कालावधीमध्ये पूर्ण न झाल्यास दंड आकारणीबाबत स्पष्ट सुचना निविदा दस्ताऐवजामध्ये समाविष्ठ करण्यात यावी व सदर दंडाची वसुली निविदेतील अटी व शर्तीनुसार करण्यात येईल.

(IV) पाणी पुरवठा योजनांसाठी प्रस्तावित करण्यात आलेल्या सर्व कामांचे बारचार्टच्या स्वरूपातील नियोजन निविदा दस्ताऐवजामध्ये समाविष्ट करण्यात यावे.

(V) जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत बोधचिन्ह (Logo) तसेच त्याचे आकारमान (Dimention) दि. ३१ जानेवारी,२०१७ रोजीच्या पत्रान्वये सर्व क्षेत्रीय कार्यालयांस कळविण्यात आले आहेत. योजनेतील उपांगाकरिता रंगरंगोटी (elevation ,colour coding etc) इ. बाबतच्या सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. या सूचनांचे पालन करणे

संबंधित कंत्राटदारास बंधनकारक राहील. याचे पालन होत आहे किंवा कसे याबाबत कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण हे जबाबदार राहतील.

(VI) योजनेची अंमलबजावणी करताना ग्रामस्थांचा सक्रिय सहभाग रहावा, यासाठी समाजव्यवस्थापन तत्वांचा अवलंब करणे तसेच संदर्भाधिन क्र. २ मधील शासन परिपत्रकान्वये पर्यावरण व्यवस्थापनाबाबत दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

०९. **राज्यस्तरीय निविदा समिती :-**

**उद्देश:-** जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणाऱ्या शहरालगतच्या नळ पाणी पुरवठा योजनांमध्ये स्वयंचलन ( Automation), स्वयंचलित जलमापके (A.M.R.) व सौर यंत्रणा (Solar System) इत्यादी अत्याधुनिक बाबींचा समावेश करण्यात येत आहे. या कार्यक्रमांतर्गत अमंलबजावणी करण्यात येत असलेल्या सर्व नळ पाणी पुरवठा योजनांमध्ये सुसत्रता यावी. याकरीता या आधुनिक बाबींची राज्यस्तरावर एकत्रितरित्या संपादणूक करुन त्याचा अमंलबजावणी यंत्रणांना पुरवठा करणे आवश्यक आहे. सदर बाबींची संपादणूक करण्याकरीता राज्यस्तरावर निविदा समिती गठीत करण्यात येत आहे.

**निविदा समितीची संरचना:-**

**राज्यस्तरीय निविदा समितीची संरचना पुढीलप्रमाणे आहे.**

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मुंबई | अध्यक्ष |
| २. | संचालक (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई | सदस्य |
| ३. | उप सचिव तथा प्रकल्प संचालक, पा. पु. व स्व. विभाग, मुंबई | सदस्य |
| ४. | प्रकल्प व्यवस्थापक, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई | सदस्य |
| ५. | वित्त नियंत्रक, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई | सदस्य |
| ६. | अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे | सदस्य |
| ७. | अवर सचिव, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

(I) जलसवराज्य-२ कार्यक्रमांतर्गत अमंलबजावणी करण्यात येत असलेल्या शहरालगतच्या नळ पाणी पुरवठा योजनांमध्ये स्वयंचलन ( Automation), स्वयंचलित जलमापके (A.M.R.) व सौर यंत्रणा (Solar System) इत्यादी अत्याधुनिक बाबींची संपादणूक करण्याकरीता निविदा दस्ताऐवज अंतिम करणे.

(II) निविदा प्रकाशित करणे व प्राप्त निविदांमधून न्युनतम देकार प्राप्त झालेल्या पुरवठादाराची निविदा अंतिम करणे.

(III) निवड करण्यात आलेल्या पुरवठादारासोबत दरकरार (Rate Contract) करणे व त्यानुसार त्यांना कार्यरंभ आदेश देणे.

(IV) जलसवराज्य-२ कार्यक्रमांतर्गत भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणे मार्फत राबविण्यात येणाऱ्या उपक्रमांकरीता आवश्यक असणाऱ्या बाबींची संपादणूक करणे.

**१०. त्रयस्थ तांत्रिक परीक्षण -**

(I) जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत पाणी पुरवठा योजनांचा दर्जा उंचावण्यासाठी तसेच सेवा पातळी मानक (Service Level Benchmark) साध्य करण्यासाठी सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षामार्फत आंतरराष्ट्रीय स्तरावरील M/s. Ernst & Young LLP, Mumbai या त्रयस्थ पडताळणी यंत्रणेची (Independent Verification Agency - IVA) नियुक्ती करण्यात आली आहे.

(II) योजनेच्या कामाचे/साहित्याचे गुणवत्तेच्या दृष्टीने तांत्रिक परीक्षण महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या गुणवत्ता परीक्षण पथकाकडून किमान २ वेळा (योजनेची २० ते ३०% कामे पूर्ण झाल्यानंतर व योजनेची ६० ते ७०% कामे पूर्ण झाल्यानंतर) करण्यात यावे व याबाबतचा अहवाल सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षास सादर करावा.

(III) योजनेच्या गुणवत्तेच्या दृष्टीने तांत्रिक परीक्षण करण्याची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील. यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास कोणताही स्वतंत्र निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

## ११. <u>पूर्णत्वाचा दाखला व हस्तांतरण</u>

(I) योजनेची १०० % भौतिक कामे पूर्ण झाल्यानंतर कंत्राटदार, ग्रामपंचायत व जिल्हा तांत्रिक समितीचे सदस्य यांनी संयुक्त पाहणी करावी. जिल्हा तांत्रिक समितीच्या शिफारशीनंतर कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी योजना भौतिकदृष्ट्या पूर्ण झाल्याचे प्रमाणपत्र दिल्यानंतर योजना पूर्ण झाली असे समजण्यात येईल.

(II) भौतिकदृष्ट्या पूर्ण झालेली योजना स्थानिक स्वराज्य संस्थेस (संबंधित ग्रामपंचायत / जिल्हा परिषद) त्वरीत हस्तांतरित करण्यात यावी. योजना हस्तांतरणाचा मसुदा परिशिष्ट ब मध्ये जोडण्यात आला आहे.

(III) योजना पुर्णत्वानंतर योजनेचे हस्तातंरण व योजनेची देखभाल दुरूस्ती योग्य प्रकारे होईल याची पाहणी करण्याची जबाबदारी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) यांची राहील व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे सनियंत्रण करतील.

## १२.<u>देखभाल व दूरुस्ती</u>

(I) योजनेची भौतिक कामे पूर्ण झाल्यानंतर योजना ग्रामपंचायतीस हस्तांतरीत करण्यात यावी. सुरवातीच्या १ वर्षासाठी योजनेची देखभाल व दुरुस्ती संबंधित कंत्राटदाराने करावी. त्यानंतरच्या पुढील ४ वर्षांच्या कालावधीसाठी मूळ कंत्राटदार / ग्रामपंचायतीने नियुक्त केलेल्या कंत्राटदाराकडून अथवा ग्रामसभेच्या स्वतंत्र प्रक्रियेद्वारे देखभाल व दुरुस्ती करुन घेण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील.

(II) १ वर्षाच्या कालावधीनंतर पुढील ४ वर्षांच्या देखभाल व दुरुस्तीसाठी कामगारांचा पगार, वीज देयके व जलशुद्धीकरणासाठी लागणारी रसायने याकरिता लागणारा खर्च कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची राहील. हा खर्च ग्रामपंचायतीने पाणीपट्टी वसूलीच्या रकमेमधून करावा.

(III) योजना स्वयंनिर्भर होण्याच्या दृष्टीने योजनेच्या वार्षिक देखभाल व दुरुस्ती अंदाजपत्रकास ग्रामसभेची मान्यता घेवून योग्य पाणीपट्टी आकारणे व योजना चालविणे याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची राहील.

(IV) योजनेच्या देखभाल व दुरुस्तीसाठी शासनामार्फत कोणत्याही प्रकारचे अनुदान अनुज्ञेय असणार नाही.

## १३. निधी वितरण

जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतच्या भागामध्ये अंमलबजावणी करावयाच्या नळ पाणी पुरवठा योजनांसाठी जिल्हानिहाय व योजनानिहाय आवश्यक निधीची मागणी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्याकडे करण्यात यावे. सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (पापु-११) यांचेमार्फत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास खालीलप्रमाणे टप्प्याटप्प्याने निधी वितरीत करण्यात येईल.

| टप्पा | उद्दिष्ट | निधी वितरण |
|---|---|---|
| १ | प्रशासकीय मान्यता झाल्यानंतर | २०% |
| २ | उद्भव व उर्ध्ववाहिनी व जलशुद्धीकरण केंद्र यांची कामे पूर्ण झाल्यानंतर | ३०% |
| ३ | साठवण टाक्या, गुरुत्ववाहिनी व वितरण व्यवस्था यांची कामे पूर्ण झाल्यानंतर | ३०% |
| ४ | जलमापकासह १०० टक्के नळजोडणी व त्रयस्थ पडताळणी यंत्रणेची (Independent Verification Agency - IVA) पडताळणी झाल्यानंतर | २०% |

## १४. निधी संवितरण निर्देशांक (Disbursement Linked Indicators - DLI) :-

(I) जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत जागतिक बँकेकडून उपलब्ध होणारे अर्थसहाय्य खालीलप्रमाणे २ प्रमुख उद्दीष्टपूर्ती निर्देशांक पूर्ण झाल्यानंतर प्राप्त होणार आहे.

- ❖ शहरालगतच्या भागांमध्ये वाढीव सेवा पुरविण्यासाठी १००% जलमापकासह वैयक्तिक नळजोडण्यांची संख्या.
- ❖ सदर नळजोडण्यांमधून होणारा पाणी पुरवठा सातत्याने व समाधानकारकरित्या (Sustainable) सुरु राहणे.

❖ वेळोवेळी शासनाने दिलेल्या सूचनांनुसार सेवा पातळी मानक साध्य करणे बंधनकारक राहील.

**१५. संनियंत्रण :-**

जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत शहरालगतची गावे / वाडया / वस्त्या यांना दरडोई दरदिवशी ७० लिटर्सप्रमाणे (७० LPCD) पिण्याच्या पाण्याच्या सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनांचे संनियंत्रण महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामध्ये स्थापन करण्यात आलेल्या विशेष संनियंत्रण कक्षामार्फत करण्यात यावे. विशेष संनियंत्रण कक्ष, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना नळ पाणी पुरवठा योजनांच्या आर्थिक व भौतिक प्रगतीबाबतचा मासिक अहवाल सादर करावा. सदर कार्यक्रमांतर्गत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनांचे संपूर्ण नियंत्रण उप सचिव तथा प्रकल्प संचालक व प्रकल्प व्यवस्थापक यांच्या अधिपत्याखालील सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्यामार्फत करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१५१५२५३५८४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Kumar

Digitally signed by Rajesh Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1e08bc9f719f8ce54a66ae d8ed2a521ee2d571facec17b204b2 86a31e88c58d9, cn=Rajesh Kumar
Date: 2017.02.18 12:03:38 +05'30'

**(राजेश कुमार)**
**प्रधान सचिव**

**प्रत तातडीच्या आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-**

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
२. संचालक (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

३. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मुंबई.

४. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.

**प्रत माहितीस्तव :-**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य (सर्व), महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई.

५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. विभागीय आयुक्त (सर्व)

८. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.

९. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.

१०. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

११. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.

१२. जिल्हाधिकारी (सर्व)

१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१४. मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

१५. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

१६. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद (सर्व)

१७. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

१८. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)

१९. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा (सर्व)

२०. पा. पु. व स्व. विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने, मंत्रालय, मुंबई.

२१. निवड नस्ती (कार्यासन पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, बेलापूर, नवी मुंबई.

२२. निवड नस्ती (कार्यासन पापु-४, ५, ७, २०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मुंबई.

## परिशिष्ट अ

## <u>ग्रामसभा ठराव</u>

ग्रामपंचायत-------------------, तालुका-----------------, जिल्हा ------------- ठराव क्रमांक ----------- दिनांक ------------

महाराष्ट्र राज्याच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत जिल्हा परिषद----------- अंतर्गत राबविण्यात येत असलेल्या निमशहरी भागासाठीच्या वाढीव पाणी पुरवठा व स्वच्छता सेवा मिळविण्यासाठीच्या कार्यक्रमात सहभागी होण्याच्या दृष्टिने खालीलप्रमाणे ठराव करण्यात येत आहेत.

१. निमशहरी भागासाठी वाढीव पाणी पुरवठा व स्वच्छता सेवा पुरविण्याबाबत शासन निर्णय दिनांक ०७/०६/२०१२ अन्वये देण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचना व त्यामध्ये शासनाकडून वेळोवेळी करण्यात येणारे बदल यांच्या अनुषंगाने देण्यात येणाऱ्या सर्व सूचना ग्रामपंचायतीस मान्य आहेत.
२. एखादया ग्रामपंचायतीमधील फक्त काही भागच निम-शहरी म्हणून घोषित झाला असल्यास फक्त तेवढया भागासाठीच वाढीव सुविधांचे नियोजन करता येईल.
३. स्त्रोताच्या उपलब्धतेनुसार आवश्यक असल्यास जिल्हा स्तरीय कार्यक्रम समन्वय समितीमार्फत पात्र निम-शहरी भागांचे समूह (क्लस्टर) तयार करण्यात येतील. याबाबत जिल्हा कार्यक्रम समन्वय समितीचा निर्णय अंतिम राहील आणि ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील.
४. कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी जिल्हा परिषद सोबत आवश्यक ते करार करण्यास तयार आहे.
५. कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीला मार्गदर्शन करण्यास तसेच कामावर देखरेख ठेवण्याकरिता सामाजिक लेखा परिक्षण समितीची स्थापना करण्यात येईल.
६. योजना व अंमलबजावणीच्या काळात १००% घरगुती नळजोडण्या व वैयक्तीक शौचालये बांधण्याचे उद्दीष्ट साध्य करण्यास ग्रामपंचायत कटीबध्द असून त्याची संपूर्ण जबाबदारी ग्रामपंचायतीवर राहील.
७. दर वर्षी पाणी पट्टी व स्वच्छता सुविधांच्या देखभाल व दुरुस्तीचे अंदाजपत्रक तयार करुन त्यास ग्रामसभेची मान्यता घेण्यात येईल. पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधा

आर्थिक व तांत्रिकदृष्टया समाधानकारकरित्या चालाव्यात या दृष्टिने, सविस्तर कार्यक्रम अहवालात दर्शविण्यात आलेल्या रक्कमेपेक्षा कमी असणार नाही एवढी, पाणी पट्टी व स्वच्छता कर आकारण्यात येईल.

८. जलमापकासह १००% नळजोडण्या देण्याबाबत शासनाच्या धोरणानुसार आवश्यक ती कार्यवाही तसेच नळ जोडणीसाठी आवश्यक सुरक्षा ठेव व मीटरबाबतचे आवश्यक शुल्काबाबत, शासन जे धोरण ठरवेल त्यानुसार ग्रामपंचायत कार्यवाही करण्यास तयार आहे.

९. तांत्रिक दृष्टया आवश्यक असल्यास अंमलबजावणी यंत्रणेमार्फत ठोक तत्वावर पाणी पुरवठा करण्यात येईल. अशा प्रकारची योजना राबविण्यास, ठोक जलमापकानुसार पाणी पट्टी भरण्यास व गावातील अंतर्गत वितरण व्यवस्थेची १००% देखभाल-दुरुस्तीची जबाबदारी स्विकारण्यास ग्रामपंचायत मान्यता देत आहेत.

१०. ठोक पाणी पुरवठा योजनेची अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणेने मागणी केल्यानुसार विहित मुदतीत पाण्याच्या देयकाची रक्कम भरणा करण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीची आहे. याबाबत कुचराई झाल्यास ठोक नळ जोडणीव्दारे होणारा पाणी पुरवठा बंद करण्याचा अधिकार अंमलबजावणी यंत्रणेस राहील.

११. गावातील घनकचरा व्यवस्थापनासाठी जिल्हा परिषदेच्या सहाय्याने आवश्यक त्या पर्यावरण पूरक उपाययोजना राबविण्यात येतील. या बाबतचा स्वतंत्र कृती आराखडा तयार करुन त्यास विहीत प्रक्रियेनुसार मान्यता प्राप्त करुन घेण्यात येईल.

१२. ग्रामपंचायतीच्या पाणी पुरवठा योजनेसाठी लागणारी आवश्यक जमिन व आवश्यक तेथे विविध शासकीय विभागांच्या परवानगी घेण्याची जबाबदारी पूर्णपणे ग्रामपंचायतीची राहील.

१३. पाणी पुरवठा योजनेच्या कामासाठी ई-निविदा प्रक्रियेव्दारे निवडलेल्या कंत्राटदारांना काम करताना आवश्यक ते सहकार्य तसेच अडीअडचणी सोडवण्यासाठी ग्रामपंचायतीमार्फत मदत करण्यात येईल.

**ग्रामसेवक** **सरपंच**

## परिशिष्ट ब

## योजना हस्तांतरण नमुना

### जलस्वराज्य -२ कार्यक्रमांतर्गत निमशहरी ग्रामपंचायतीतील पाणी पुरवठा योजना हस्तांतरण नमुना

| | |
|---|---|
| ग्रामपंचायतीचे नाव | |
| तालुका | |
| जिल्हा | |
| पाणी पुरवठा योजनेमध्ये समाविष्ट गावांची संख्या | |
| पाणी पुरवठा योजनेमध्ये समाविष्ट गावांची नावे | |
| सध्याची लोकसंख्या<br>(सन २०१५-२०१६-२०१७) | |
| योजनेची प्रस्तावित लोकसंख्या<br>वर्ष | |
| कुटुंबांची संख्या | |
| नळ जोडण्या (AMR मीटर्ससह) संख्या | |
| योजनेची मंजूर किंमत (रु.) | |
| योजनेची अंतिम किंमत (रु.) | |
| योजना पूर्ण झाल्याचा दिनांक | |
| पाणी पुरवठा सुरु झाल्याचा दिनांक | |

पाणी पुरवठा योजनेमध्ये समाविष्ट उपांगे:-

| अ.क्र. | उपांगाचा प्रकार | व्यास | खोली | लांबी, रुंदी, उंची | किंमत (रु.) |
|---|---|---|---|---|---|
| १ | उद्भव विहिर | | | | |
| २ | इंटेक वेल | | | | |
| ३ | कनेक्टिंग पाइप | | | | |
| ४ | पंपगृह प्रकार | | | | |

प्रक्रिया पूर्व पाण्याची पंपींग मशिनरी :-

| अ.क्र. | प्रकार | क्षमता | संख्या |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |

उर्ध्ववाहिनी : -

| अ.क्र. | लांबी | रुंदी | व्यास | प्रकार |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |

जलशुध्दीकरण केंद्र :-

| अ.क्र. | ठिकाण | प्रकार | क्षमता | उपांगे |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |

शुध्द पाणी पंपींग मशिनरी :-

| अ.क्र. | प्रकार | क्षमता | संख्या |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |

उंच जलकुंभ :-

| अ.क्र. | प्रकार | क्षमता | स्टेजींग उंची | संख्या | ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |
| | | | | | |

**जमिनीवरील जलकुंभ :-**

| अ.क्र. | प्रकार | क्षमता | संख्या | ठिकाण |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |

**वितरण व्यवस्था :-**

| अ.क्र. | प्रकार | लांबी | व्यास | प्रेशर रेटींग |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |

**सोलार सिस्टीम क्षमता :-**

**निर्जंतुकीकरण व्यवस्था प्रकार : -**

**इतर उपांगे :-**

| अ.क्र. | प्रकार | लांबी रुंदी उंची खोली | किंमत | व्यास |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |

जलस्वराज्य -२ कार्यक्रमांतर्गत ______________ ग्रामपंचायतीमधील ______________ गावांची / वाड्यांची / पाड्यां नळ पाणी पुरवठा योजना दिनांक / /२०१ रोजी ______________ ठिकाणी झालेल्या महिला सभा व दिनांक / /२०१ रोजी ______________ ठिकाणी झालेल्या सर्वसाधारण ग्रामसभेत घेतलेल्या ठराव क्रमांक _____ नुसार ग्रामपंचायतीच्या वतीने योजना ताब्यात घेण्यात येत आहे.

वरील प्रमाणे संपूर्ण योजनेची व उपांगांची आम्ही समक्ष पाहणी केली असून, सदर उपांगे सुस्थितीत आहेत व सदर योजना ग्रामपंचायतीमार्फत ताब्यात घेण्यात येत आहे.

१. जलस्वराज्य -२ कार्यक्रमांतर्गत सदर पाणी पुरवठा योजना चालविण्याची व योजनेच्या देखभाल व दुरुस्तीची, पाणी देयके तयार करुन पाणीपट्टी वसुलीची

आवश्यक देयके नियमित भरण्याची, योजनेसाठी कर्मचारी नेमण्याची व त्यांना निमयमित वेतन देण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील.

२. पाणी पुरवठा सुरु झाल्यापासून पहिले १ वर्ष जरी कंत्राटदार देखभाल व दुरुस्ती करणार असेल तरी ग्रामस्थांकडून नियमितपणे पाणीपट्टी जमा करुन ग्रामपंचायतीच्या संबंधित खात्यात जमा करण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील.

**हस्तांतरीत करणार** | **हस्तांतरीत करुन घेणार**

**कार्यकारी अभियंता**
**महाराष्ट्र जीवन प्राधिकरण**
**सही व शिक्का**

**सरपंच**
**ग्रामपंचायत**

**ग्रामसेवक /**
**ग्रा. वि. अ. ग्रामपंचायत**
**सही व शिक्का**

**समक्ष**

**ग्रामपंचायत सदस्य (किमान २)**

**उप मुख्य कार्यकारी अधिकारी**
**(पा. व स्व.), जि.प.**
**सही व शिक्का**

**१) नाव व सही -**

**२) नाव व सही -**

**गटविकास अधिकारी,**
**पंचायत समिती -**
**सही व शिक्का**

**कंत्राटदार** - पाणी पुरवठा योजना हस्तांतरीत झाल्यावर १ वर्ष या कालावधीसाठी योजनेची देखभाल व दुरुस्ती करण्याकरिता मी कंत्राटदार श्री. / श्रीम. **_______________**, मेसर्स. **______________** जबाबदार राहील.

**कंत्राटदाराचे नाव, सही व शिक्का**